राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत मौजे विजयनगर (ता.कराड, जि.सातारा) नळ पाणी पुरवठा योजनेच्या वाढीव दरडोई खर्चाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.

## महाराष्ट्र शासन

### पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग

### शासन निर्णय क्रमांकः पापुयो-२११२/प्र.क्र.१३२/पापु-१७

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख: २३जुलै, २०१४

**वाचा**

१) शासन निर्णय क्रमांकः ग्रापाधो-११०९/१०४(अ)/पापु-०७ दिनांक १७ मार्च २०१०.
२) शासन निर्णय क्रमांकः ग्रापाधो-१२०८/प्र.क्र.५२/पापु-०७, दिनांक ०९ ऑक्टोबर २०१३
३) शासन निर्णय क्रमांकः ग्रापाधो-१११४/२२/पापु-०७, दिनांक ०९ जुलै,२०१४
४) शासन निर्णय क्रमांकः ग्रापाधो-१११४/२२/पापु-०७, दिनांक ०९ जुलै,२०१४
५) मु.का.अ. जि.प.सातारा यांचे पत्र क्र. ग्रापापुवि/ता-४/१०४७२०१२, दिनांक १८ जून,२०१२
६) शासन पत्र क्र. पापुयो-२११२/प्र.क्र१३२/पापु-१७, दिनांक ३० जून,२०१४
७) मु.का.अ. जि.प.सातारा यांचे पत्र क्र. ग्रापापुवि/ता-२/कराड/१४०३, दिनांक ८ जुलै,२०१४

**प्रस्तावना:-**

विजयनगर (ता. कराड, जि.सातारा) २४ x ७ नळ पाणी पुरवठा योजनेच्या वाढीव दरडोई खर्चाच्या अंदाजपत्रकास मान्यता देणेबाबतचा प्रस्ताव संदर्भाधीन पत्र क्र. ५ अन्वये शासन मान्यतेसाठी सादर करण्यात आला होता. सदर योजनेस अधिक्षक अभियंता, भारत निर्माण कक्ष, पुणे यांनी दि. २७ जून, २०१२ रोजी तांत्रिक मान्यता प्रदान केली आहे. विजयनगर गावाची लोकसंख्या ५,००० पेक्षा कमी आहे. ग्रामसभेच्या मागणीनुसार ७० लिटर दरडोई दरदिवशी क्षमतेची २४ x ७ नळ पाणी पुरवठा योजना प्रस्तावित करण्यात आली आहे. यानुषंगाने संदर्भाधीन शासन पत्र ६ अन्वये विजयनगरसाठी नियमित योजना सादर करण्याचे निर्देश जिल्हा परिषदेस देण्यात आले होते. तथापि, जिल्हा परिषदेने ग्रामसभेच्या मागणीनुसार संदर्भ क्र ७ येथील पत्रान्वये २४ x ७ नळ पाणी पुरवठा योजना रू. १,४४,०७,१८०/- इतक्या ढोबळ किंमतीची प्रस्तावित करण्यात आली व त्यासाठी लागणारा ज्यादा निधी ग्रामपंचायती मार्फत उपलब्ध करून देण्यात येईल, असे शासनास कळविण्यात आले आहे. संदर्भ क्रमांक २ येथील शासन निर्णयान्वये विहीत करण्यात आलेल्या दरडोई खर्चाच्या वाढीव १००% च्या

मर्यादेत व उर्वरित रक्कम ग्रामपंचायतीने भरण्याच्या अटीच्या अधीन राहून सदर योजनेच्या वाढीव दरडोई खर्चाच्या अंदाजपत्रकास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय:-

प्रस्तावनेत नमूद केलेली वस्तुस्थिती विचारात घेता, ७० लिटर दरडोई दरदिवशी क्षमतेच्या मौजे विजयनगर (ता.कराड, जि. सातारा) २४ x ७ नळ पाणी पुरवठा योजनेच्या रू. ५९०६ इतक्या वाढीव दरडोई खर्च असलेल्या रू. १,२८,३९,६००/- (रूपये एक कोटी अठ्ठावीस लक्ष एकोणचाळीस हजार सहाशे फक्त) इतक्या ढोबळ किंमतीच्या वाढीव दरडोई खर्चाच्या अंदाजपत्रकास व आराखड्यास शासन प्रशासकीय मान्यता देत आहे.

२. संदर्भ क्र. ३च्या शासन निर्णयान्वये ग्रामीण पाणी पुरवठा योजनांसाठी लोकवर्गणी पुर्णत: रद्द करण्यात आल्यामुळे सदर योजनेसाठी रू. १,२८,३९,६००/- (रूपये एक कोटी अठ्ठावीस लक्ष एकोणचाळीस हजार सहाशे फक्त) इतका शासन निधी उपलब्ध करून देण्यात येईल व उर्वरित आवश्यक निधी ग्रामपंचायतींने उपलब्ध करून द्यावा.

३. ७० लिटर दरडोई दरदिवशी क्षमतेच्या मौजे विजयनगर २४ x ७ नळ पाणी पुरवठा योजनेच्या वाढीव दरडोई खर्चाच्या अंदाजपत्रकास व आराखड्यास खालील अटींची पूर्तता करण्याच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे

अ) सदर योजनेच्या अंमलबजावणीसाठी संदर्भ क्र. ४ च्या शासन निर्णयान्वये विहीत केलेल्या मार्गदर्शक सुचनांचा अवलंब करण्यात यावा.

ब ) जलसंपदा विभागाकडून पिण्याच्या पाण्यासाठी वाढीव आरक्षण मंजूर झाल्याशिवाय निविदा मागविण्यात येऊ नयेत.

क) योजनेची कामे विहीत पध्द्तीने निविदा मागविण्यात येऊन करावीत. जादा किंमतीच्या निविदा स्विकृत करण्यापूर्वी तसेच मंजूर दरापेक्षा जास्त दराने साहित्य (उदा. पाईप्स्) घेण्यापूर्वी पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाची परवानगी घ्यावी

ड) योजनेचे काम मंजूर किंमतीत कालबध्द व नियोजनबध्द पूर्ण करण्यात यावे. योजनेची कामे टप्प्या- टप्प्याने करावीत. योजना २४ x ७ पद्धतीने राबविण्याची संपुर्ण जबाबदारी ग्रामपंचायतीची व अधिक्षक अभियंता, भारत निर्माण कक्ष, पुणे यांची राहील.

इ) योजना चालविण्यासाठी व देखभाल दुरूस्तीसाठी येणारा खर्च भागविण्यासाठी ग्रामपंचायत विजयनगर यांनी योग्य ती पाणीपट्टी निश्चित करावी व योजनेची देखभाल दुरूस्ती करावी. त्यासाठी शासनाकडून अनुदान उपलब्ध करून देण्यात येणार नाही.

ई) योजनेमध्ये नळ जोडणीसाठी १००% मिटरींग करण्यात यावे. नळ जोडणीचा व घरगुती मिटरचा खर्च संबंधित ग्राहकांनी करावा

फ) संपूर्ण गाव हगणदारीमुक्त करण्यात यावे.

ज) कोणत्याही कारणाने खर्चात वाढ झाल्यास शासन अनुदान उपलब्ध करून देण्यात येणार नाही.

ह) सदर योजनेच्या तांत्रिक मान्यतेच्या आदेशातील अटींची व राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमातंर्गत ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसंदर्भात शासनाने विहीत केलेल्या मार्गदर्शक सुचनांचा अवलंब करण्यात यावा.

४. या योजनेवर होणारा खर्च जिल्हा परिषदेला प्राप्त राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमातंर्गत केंद्र तथा राज्य निधीतून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०७२३१४५३१६६१२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

AMBEKAR SURESH D
Digitally signed by AMBEKAR SURESH D
DN: CN = AMBEKAR SURESH D, C = IN, S = Maharashtra, O = Govt Of Maharashtra, OU = Water Supply and Sanitation
Date: 2014.07.23 17:17:12 +05'30'

**(सु.दे. आंबेकर)**
**कार्यासन अधिकारी , महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र -१, मुंबई / महाराष्ट्र २, नागपूर.
२) महालेखापाल, लेखा परीक्षा, महाराष्ट्र -१, मुंबई / महाराष्ट्र २, नागपूर.
३) सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, एक्सप्रेस टॉवर्स, मुंबई-२१,
४) विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे.
५) जिल्हाधिकारी, सातारा
६) संचालक, भूजल सर्वेक्षण विकास यंत्रणा, पी.एम.टी.बिल्डींग स्वारगेट, पुणे.
७) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सातारा
८) मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
९) मा.राज्य मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१०) प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
११) मुख्य अभियंता (ना व ग्रा ), म.जी.प्रा., ठाणे.
१२) संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, सिडको भवन, बेलापूर, नवी मुंबई
१३) अधीक्षक अभियंता, भारत निर्माण कक्ष, विभागीय कार्यालय, पुणे
१४) अधीक्षक अभियंता, म.जी.प्रा. ना.व ग्रा. योजना मंडळ, पुणे
१५) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा, जिल्हा परिषद, सातारा
१६) कार्यकारी अभियंता, म.जी.प्रा., ना. व ग्रा.यो.विभाग, कराड

१७) जिल्हा वरिष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, सातारा
१८) मुख्य अभियंता तथा विशेष कार्य अधिकारी, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, यांचे स्वीय सहाय्यक मंत्रालय, मुंबई.
१९) निवड नस्ती.